**मुस्लीम धर्मीयांच्या सणासाठी जाहीर सुट्टी ऐवजी सण अन्य दिवशी येत असल्यास त्या दिवसाच्या रजेसाठी करावयाच्या तात्कालीक व्यवस्थेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : सार्वसु-१११६/प्र.क्र.२५०/२९,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २७ डिसेंबर, २०१६

**वाचा:** शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सार्वसु-१११६ /प्र.क्र.१३८/ २९, दि.१८.११.२०१६

**शासन परिपत्रक:-**

शासन अधिसूचना,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सार्वसु-१११६ /प्र.क्र.१३८/ २९, दिनांक १८.११.२०१६ अन्वये सन २०१७ या वर्षासाठीच्या सार्वजनिक सुट्टया जाहिर करण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये जाहिर करण्यात आलेल्या मुस्लीम धर्मीयांच्या सणासाठीच्या सुट्टी जाहिर केलेल्या दिवसा ऐवजी सण अन्य दिवशी येत असल्यास मुळ घोषित सुट्टीमध्ये बदल न करता राज्यामधील मुस्लिम शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना या दिवशी पूर्वपरवानगीशिवाय नैमित्तिक रजा अथवा नैमित्तक रजा खात्यावर शिल्लक नसल्यास, अर्जित रजा मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी तसेच सर्व शासकीय कार्यालयाचे संबंधित पर्यवेक्षीय अधिकारी यांनी त्यांच्या विभागातील/जिल्हयातील / कार्यालयातील सर्व मुस्लिम शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना जे या दिवशी पूर्वपरवानगीशिवाय गैरहजर राहीले असतील त्यांना वरीलप्रमाणे रजा त्यांच्या रजा मागणी अर्जानुसार मंजूर करावी.

३. सदरचे आदेश राज्य शासनातील सर्व मुस्लीम अधिकारी/ कर्मचारी यांचेसाठी भविष्यातील त्यांच्या सणासाठीच्या सर्व घोषित सुट्टयांच्या बाबत ऐनवेळी सणाच्या दिवसामध्ये बदल होण्याच्या परिस्थितीतील स्थायी व्यवस्था म्हणून लागु राहतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२२७१६१७३६५९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra M Jadhav

Digitally signed by Rajendra M Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=656ebca17998fd5c29178a5abcf1aa60d72bd5515ddc791d9ad9786418f07e4f, cn=Rajendra M Jadhav
Date: 2016.12.27 16:25:33 +05'30'

(रा.मा.जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव,मंत्रालय,मुंबई.
३. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री/ यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधानसचिव/सचिव, मंत्रालय,मुंबई
६. सर्व मंत्रालयीन विभाग
७. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई(आवश्यक ती प्रसिध्दी देण्यास्तव)
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
११.आयुक्त, सर्व महानगरपालिका,
१२.निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग,नवी दिल्ली,
१३.निवडनस्ती (कार्यासन-२९).